वितरण आदेश क्रमांक: ३
कोषागारातून रोख रक्कम देय अनुदान
२०१६-२०१७.

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या हप्त्याचे वितरण

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१७/प्र.क्र.७/ वित्त-४.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: १६ जानेवारी, २०१७.

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र.२६/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १६ /७/२०१५.
२. शासन निर्णय क्रमांकः जीपीडीपी-२०१५/प्र.क्र.३८/ पंरा-६ ,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ४ /११/२०१५.
३. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र.२६/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २१ /१२/२०१५.
४. शासन निर्णय क्रमांकः संग्राम-२०१५/प्र.क्र.९३/संग्राम कक्ष,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ११ /८/२०१६.
५. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र.२६/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २८ /४/२०१६.
६. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१६/प्र.क्र.१४४/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३१ /८/२०१६.
७. अ.शा.प.क्र. चौविआ २०१६/ प्र.क्र.१५१/वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २८ /९/२०१६ व दि. २७/१०/२०१६ चे पत्र.
८. पत्र वित्त विभाग क्र. चौविआ- १०१५/प्र.क्र.१९/ वित्त आयोग कक्ष, दि. १३/१/२०१७ सोबतचे केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे पत्र क्र. एफ १३ (४१) एफएफसी/ एफसीडी/ २०१५-१६, दि. ११/१/२०१७.

प्रस्तावना -

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांकरीता सन २०१६-१७ च्या जनरल परफॉर्मन्स ग्रँटचा रु. २९४.८४०० कोटी इतका निधी संदर्भाधीन अ.क्र. ८ येथील आदेशान्वये केंद्र शासनाने मुक्त केलेला असून प्रस्तुत अनुदान राज्यास दि. ११/१ /२०१७ रोजी प्राप्त झाले

आहे. सदर अनुदान राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करावयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय -

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगाचा सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचा जनरल परफॉर्मन्स ग्रँटचा केंद्र शासनाकडून मुक्त करण्यात आलेला रु. २९४.८४०० कोटी इतका निधी संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील दि. २८ एप्रिल,२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहीत निकषानुसार यथायोग्य पात्र ग्रामपंचायतींना वितरीत करण्यासाठी i) लोकसंख्या ii) क्षेत्रफळ या निकषाआधारे सोबतच्या विवरणपत्रात (प्रपत्र ब) दर्शविल्याप्रमाणे सर्व जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीम्सवर) वितरीत करण्यात येत आहे.

२.१ चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्राप्त संपूर्ण अनुदान ग्रामपंचायतींना वितरीत करावयाचे आहे. त्याकरीता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन परफॉर्मन्स ग्रँटच्या सन २०१६-१७ या पहिल्या आर्थिक वर्षाच्या वितरणाबाबतचे निकष ग्रामविकास विभागाने संदर्भाधीन दि.२८ एप्रिल,२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केले आहेत. त्यानुसार खालील दोन अटींची पूर्तता करतील, त्याच ग्रामपंचायती परफॉर्मन्स ग्रँटचे अनुदान मिळण्याकरीता पात्र ठरणार आहेत.

(अ) ग्रामपंचातींनी त्यांचे लेखे ठेवणे आवश्यक असून त्यांचे अद्ययावत (दोन वर्षाचे आतील कालावधीचे) लेखापरिक्षण झाले असावे. या लेखापरिक्षित लेख्याव्दारे ग्रामपंचायतीचे उत्पन्न व खर्च यासंबंधीची विश्वासार्ह माहीती सुस्पष्टपणे उपलब्ध करणे. उदा. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचे परफॉर्मन्स ग्रँट मिळण्याकरीता पात्र ठरण्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाचे लेखापरिक्षण झालेले असावे.

(आ) वरील लेखापरिक्षित लेख्याच्या आधारे ग्रामपंचायतीच्या स्वउत्पन्नात मागील वर्षापेक्षा वाढ झाली असावी.

२.२ त्यानुसार दि. २८ एप्रिल,२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या निकषानुसार ज्या ग्रामपंचायती सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचे परफॉर्मन्स ग्रँट मिळण्यासाठी अटींची पूर्तता करतील त्यांना लोकसंख्या ९०% व क्षेत्रफळ १०% या निकषाच्या आधारे त्यांच्या हिस्याचे अनुदान वितरीत करण्यात यावे.

२.३ सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचे परफार्मन्स ग्रँट मिळण्यास अपात्र ठरल्यामुळे अपात्र ग्रामपंचायतींच्या हिश्याचे शिल्लक अनुदान पात्र ग्रामपंचायतीमध्ये समप्रमाणात वितरीत करण्यात यावे.

३. वरीलप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी संपूर्ण निधी, विहित केलेल्या निधी वाटपाच्या निकषांच्या आधारे त्यांच्या अधिनस्त सर्व पात्र ग्रामपंचायतींना इ.सी.एस.(Electronic Clearance System)/एन.इ.एफ.टी (National Electronic Fund Transfer) किंवा आर.टी.जी.एस (Real Time Gross Settlement) या आधुनिक बँकिंग सिस्टीमद्वारे संबंधित पात्र ग्रामपंचायतींच्या खात्यावर ५ ते १० दिवसांच्या आत तातडीने वर्ग करावा. याप्रमाणे निधी वितरीत करण्यास विहीत कालावधीपेक्षा जास्त विलंब लागल्यास त्या विलंबाबाबत ग्रामपंचायतींना भारतीय रिझर्व बँकेच्या दराने जिल्हा परिषदेस व्याज द्यावे लागेल, याची नोंद घ्यावी. संपूर्ण निधी विहित निकषानुसार सर्व पात्र ग्रामपंचायतींना वितरीत करून त्याबाबतचे प्रमाणपत्र सोबत जोडलेल्या "प्रपत्र -अ" नुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शासनास तातडीने सादर करावे.

४. ग्रामपंचायतींनी, चौदाव्या वित्त आयोगाचा निधी यापूर्वी दिलेल्या सूचनांनुसार चौदाव्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त निधीच्या व्यवहारासाठी उघडलेल्या बँकेच्या स्वतंत्र बचत खात्यातच ठेवावा.

५. शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार ग्रामपंचायत स्तरावरील निधीच्या खर्चाचे व वितरणाचे नियोजन, सनियंत्रण व समन्वयनाची जबाबदारी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) यांची राहील.

६. ग्रामपंचायतींनी चौदाव्या वित्त आयोगांतर्गत खात्यातील व्यवहार ग्रामपंचायतीच्या नावाने सरपंच व ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने व्हावे.

७. ग्रामपंचायतींनी प्राप्त निधीपेक्षा जास्त खर्च करू नये व जास्तीचे आर्थिक दायित्व निर्माण करू नये.

८. ग्रामपंचायत स्तरासाठी वरील वितरीत निधीतून होणारा खर्च "मागणी क्र एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८- ग्रामपंचायतीस सहाय्य (००)(०९) १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार ग्रामपंचायतींना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (जनरल परफॉर्मन्स ग्रँट) (२५१५ २४९५), (योजनेतर) ३१-सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी ह्या शासन निर्णयाच्या प्रती त्यांचे अधिनस्त सर्व जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत स्तरावरील अधिकाऱ्यांना तात्काळ उपलब्ध करून द्याव्यात.

१०. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २/२०१७ वित्त आयोग कक्ष, दिनांक १३/१/२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१७०११३१६४६४२७६२० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Maya Roop Vasudeo

Digitally signed by Maya Roop Vasudeo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6feaef8191e4a5cf83f3409f76214c1bbb386df214f40eb3db528e6ea18a3bb1, cn=Maya Roop Vasudeo
Date: 2017.01.17 11:24:06 +05'30'

माया रु. वासुदेव
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१)मा. राज्यपालांचे सचिव,
२)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३)मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४)मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
५) सर्व जिल्हा परिषदांचे मा. अध्यक्ष,
६) सर्व मा. विधानसभा व विधान परिषद सदस्य,
७)मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
८)महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतींसह),
९)महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतींसह),
१०)अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११)सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक,
१२) सर्व विभागीय आयुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय ( सर्व ),
१३) सर्व सह/उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५) संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे,
१६) संचालक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई,

१७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
१८) सर्व महसूल विभागाचे उप आयुक्त (विकास),
१९) सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत),
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१) गट विकास अधिकारी (सर्व) (संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मार्फत),
२२) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थोपाय/वित्त आयोग कक्ष/अर्थसंकल्प -१७),
२३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग (सर्व कार्यासने),
२४) निवड नस्ती (वित्त-४).

## प्रपत्र-अ

प्रमाणित करण्यात येते की, १४ व्या वित्त आयोगांतर्गत सन -----------या वर्षाचा जनरल परफॉर्मन्स ग्रँटचा शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.----------------, दि.--------अन्वये प्राप्त सर्व निधी ---------(संबंधित जिल्हा परिषदेचे नाव) या जिल्हा परिषदेच्या अधिनस्त पात्र ग्रामपंचायतींना शासनाच्या मार्गदर्शक सूचना तसेच विहित केलेल्या निकषानुसार वितरीत करण्यात आली आहे.

पात्र ग्रामपंचायतींची संख्या -

अपात्र ग्रामपंचायतींची संख्या-

सही:
नाव:
दिनांक:
(मुख्य लेखा व वित्त अधिकारी)
जिल्हा परिषद ---------

सही:
नाव:
दिनांक:
(मुख्य कार्यकारी अधिकारी)
जिल्हा परिषद ---------

# प्रपत्र- ब

## जनरल परफॉर्मन्स ग्रँट

### वितरण आदेश क्र.३ क्र.चौविआ-२०१७/प्र.क्र. ७ /वित्त-४ ,दिनांक १६/१/२०१७ चे विवरणपत्र

(रू.हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | एकूण रक्कम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ठाणे | ४४९९० |
| २ | पालघर | ७३३१४ |
| ३ | रायगड | ७८५६१ |
| ४ | रत्नागिरी | ६६२३७ |
| ५ | सिंधुदूर्ग | ३७०८७ |
| ६ | नाशिक | १६६०५३ |
| ७ | धुळे | ७०७७२ |
| ८ | नंदूरबार | ६४९७४ |
| ९ | जळगाव | १३५८४७ |
| १० | अहमदनगर | १७२८३९ |
| ११ | पुणे | १७३०८२ |
| १२ | सातारा | ११४७६७ |
| १३ | सांगली | ९८७०१ |
| १४ | सोलापूर | १४०१२४ |
| १५ | कोल्हापूर | १२१३८४ |
| १६ | औरंगाबाद | ९९४०६ |
| १७ | जालना | ७५६५२ |
| १८ | परभणी | ६०५७६ |
| १९ | हिंगोली | ४७७४० |
| २० | बीड | ९९७२३ |
| २१ | नांदेड | ११५६४२ |
| २२ | उस्मानाबाद | ६६७२३ |
| २३ | लातूर | ८५८१३ |
| २४ | बुलढाणा | ९७२०७ |
| २५ | अकोला | ५२६७५ |
| २६ | वाशिम | ४७२२३ |
| २७ | अमरावती | ९१५९४ |
| २८ | यवतमाळ | १०६९८० |
| २९ | वर्धा | ४३९७५ |

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | एकूण रक्कम |
|---|---|---|
| ३० | नागपूर | ७२८८४ |
| ३१ | भंडारा | ४५६१७ |
| ३२ | गोंदिया | ५२३७६ |
| ३३ | चंद्रपूर | ७२६०५ |
| ३४ | गडचिरोली | ५५२५७ |
| | एकूण | २९४८४०० |

Maya Roop Vasudeo

Digitally signed by Maya Roop Vasudeo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6feaef8191e4a5cf83f3409f76214c1bbb386df214f40eb3db528e6ea18a3bb1, cn=Maya Roop Vasudeo
Date: 2017.01.17 11:24:39 +05'30'

**मा. रु. वासुदेव**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन